**महा-कॅम्पा प्राधिकरणास सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये वितरित केलेल्या रकमेपैकी अखर्चित निधीचा सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात वापर करण्यास परवानगी देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांक : एफएलडी-२०२०/प्र.क्र.१०२/फ-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १४.०९.२०२१

वाचा :-

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व मुख्य कार्यकारी अधिकारी (महा-कॅम्पा), नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-कॅम्पा/प्र.क्र.७७/२०१९-२०/४२, दि.१४.०५.२०२१.

**प्रस्तावना :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व मुख्य कार्यकारी अधिकारी (महा-कॅम्पा), नागपूर यांनी महा-कॅम्पा प्राधिकरणास आर्थिक वर्ष २०२०-२१ मध्ये वितरित केलेल्या निधीपैकी अखर्चित रू.३८.०१ कोटी इतका निधी सन २०२१-२२ या वर्षात करावयाच्या अनिवार्य कामांवर खर्च करण्यासाठी मंजूरी देण्याची विनंती केली आहे. महा-कॅम्पा प्राधिकरणाच्या सुकाणू समितीच्या दि.१९.०५.२०२१ रोजीच्या बैठकीत सदर अखर्चित निधी खर्च करण्यास मान्यता दिली आहे. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या वार्षिक नियोजन आराखड्यातील रू.६८८.२७ कोटीपैकी रू.१०६.६६ कोटीची कामे करण्यास दि.०२.०७.२०२१ रोजीच्या पत्रान्वये मंजूरी दिली आहे. वित्त विभागाने सदर अखर्चित निधी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात खर्च करण्यास मंजूरी दिली आहे.

**शासन निर्णय :-**

महा-कॅम्पा प्राधिकरणास आर्थिक वर्ष २०२०-२१ मध्ये वितरित केलेल्या निधीपैकी अखर्चित **रू.३८,०१,०६,०९४/-** इतका निधी सन २०२१-२२ या वर्षाच्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यातील तरतूदीनुसार खालील लेखाशीर्षांतर्गत खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. महा-कॅम्पा प्राधिकरणांतर्गत पर्यायी वनीकरणाअंतर्गत होणारा खर्च **रु. २७,८६,४१,०७१/-** च्या मर्यादेत महसूल व वन विभाग, मागणी क्रमांक - सी-७, प्रधान लेखाशीर्ष - २४०६, वनीकरण व वन्यजीवन, उप प्रधान लेखाशीर्ष ०४- वनीकरण व परिस्थितीकीय विकास, गौणशीर्ष-१०३- राज्य पर्यायी वनीकरण, गटशीर्ष-०१, राज्य प्राधिकरण, (०१) (०१) पर्यायी वनीकरण (५०- इतर खर्च), **(२४०६ A ५४१)** या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

३. महा-कॅम्पा प्राधिकरणांतर्गत नक्त वर्तमान मूल्यांतर्गत होणारा खर्च **रु.८,५६,८२२/-** च्या मर्यादेत महसूल व वन विभाग, मागणी क्रमांक :- सी-७, प्रधान लेखाशीर्ष - २४०६, वनीकरण व वन्यजीवन, उप प्रधान लेखाशीर्ष ०४- वनीकरण व परिस्थितीकीय विकास, गौणशीर्ष-१०३- राज्य पर्यायी वनीकरण, गटशीर्ष-०१, राज्य प्राधिकरण, (०१) (०४) वनजमिनीचे नक्त वर्तमान मूल्य (५० - इतर खर्च), **(२४०६ A ६९५)** या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

४. महा-कॅम्पा प्राधिकरणांतर्गत व्याज अंतर्गत होणारा खर्च **रु.१०,०६,०८,२०१** च्या मर्यादेत महसूल व वन विभाग, मागणी क्रमांक :- सी-७, प्रधान लेखाशिर्ष - २४०६, वनीकरण व वन्यजीवन, उप प्रधान लेखाशीर्ष ०४- वनीकरण व परिस्थितीकीय विकास, गौणशीर्ष-१०३- राज्य पर्यायी वनीकरण, गटशीर्ष-०१, राज्य प्राधिकरण, (०१) (०५) व्याज (५० - इतर खर्च), **(२४०६ A ७०१)** या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

५. सन २०२१-२२ च्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यामध्ये मंजूर बाबींव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही, कामाची द्विरुक्ती होणार नाही याची दक्षता घ्यावी तसेच खर्च करताना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. सदर वितरित केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल याची दक्षता घ्यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.९५/अर्थोपाय, दि.१७.०८.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९१४१२०२५४९११९ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2021.09.14 12:04:37 +05'30'

**( अरविंद आपटे )**

**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व मुख्य कार्यकारी अधिकारी (महा-कॅम्पा), नागपूर
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
५) सह सचिव, अर्थोपाय / व्यय-१०, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
६) कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई
७) निवडनस्ती.